“सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२४/प्र.क्र.१४/शिक्षण-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०६ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :-** १.शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०१८/प्र.क्र.११८/ शिक्षण, दि. ११.१०.२०१८

२.शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.६३/ शिक्षण-२, दि. १२.०३.२०२४

३.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे दि.१०.०६.२०२४ रोजी चे पत्र.

**प्रस्तावना:-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासप्रवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील मुलामुलींना परदेशी उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्र.१ दिनांक ११.१०.२०१८ च्या तरतूदीनुसार सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्र.२ दिनांक १२.०३.२०२४ अन्वये निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी अमरावती विभागातील ३ विद्यार्थ्यांची निवड करण्यात आलेली आहे. सदर ३ विद्यार्थ्यांकरिता एकूण रुपये ९९,४९,३७१/- (अक्षरी नव्याान्नव लाख एकोणपन्नास हजार तीनशे एकाहत्तर फक्त) इतकी रक्कम संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय पुणे यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये प्रचलित शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार शिष्यवृत्तीसाठी निधी वितरीत करण्याबाबत प्रस्तावित केले आहे. यास्तव, सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्र.२ दिनांक १२.०३.२०२४ अन्वये निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी अमरावती विभागातील ३ विद्यार्थ्यांची निवड करण्यात आलेली आहे.सदर ३ विद्यार्थ्यांकरिता उक्त योजनेतील तरतुदीनुसार एकूण रुपये ९९,४९,३७१/- (अक्षरी नव्याान्नव लाख एकोणपन्नास हजार तीनशे एकाहत्तर फक्त) खालील तक्यातील तपशिलानुसार वितरीत करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | विद्यार्थ्याचे नाव | विद्यापीठाचे नाव | शैक्षणिक वर्ष कालावधी | दि.०६.०५.२०२४ रोजी विदेशी चलन दर | शिक्षण शुल्क | निर्वाह भत्ता | आरोग्य विमा | विमान प्रवास | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | इंद्रनील चंद्रशेखर आंबेकर | Technische University Berlin,Germany | २ वर्ष | Euro ९०.०६ | ६२०० | ९९०० | १४४० | -- | १६६४० |
| | | | | भारतीय रक्कम | रु.५५८३७२ | रु.८१०५४० | रु.१२९६८६ | रु.३५८०४ | **रु.१५,३४,४०२/-** |
| २ | धनंजय करवीर ठाकरे | London School Of Economics & Political Science, UK | ९ महिने | GBP १०५.१६ | ३८७३६ | ९९०० | ४७० | - | ४९१०६ |
| | | | | भारतीय रक्कम | रु.४०७३४७८ | रु.१०४१०८४ | रु.४९४२५ | रु.६२९५२ | **रु.५२,२६,९३९/-** |
| ३ | जयसिंग नंदकिशोर जगताप | Case Western Reserve University,US | २१ महिने | USD $ ८३.५ | २४१८० | १४००० | ० | - | ३८१८० |
| | | | | भारतीय रक्कम | रु.२०१९०३० | रु.११६९००० | ० | ० | **रु.३१,८८,०३०/-** |
| | | | | | | | | **एकूण भारतीय रक्कम** | **रु.९९,४९,३७१/-** |

२. उपरोक्तप्रमाणे निधी वितरणासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, अमरावती यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनासाठी खर्च करावा. निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हा निहाय/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. उपरोक्त निधी सदर विद्यार्थ्यास वितरीत करत असताना विद्यार्थ्यांनी सादर केलेल्या निधी मागणीचा प्रस्ताव तपासून, विद्यापिठाची कागदपत्र पडताळणी करुन, सदर निधी ज्या विद्यार्थ्याकरिता मंजूर करण्यात आलेला आहे त्याच विद्यार्थ्याकरिता खर्ची पडेल तसेच, परदेशी शिष्यवृत्ती अंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्र. १ दि. ११.१०.२०१८ व शासन शुध्दिपत्रक दि. २४.०१.२०२३ व दि.१६.०३.२०२३ मधील अटी व शर्तींची पुर्तता करुन संबंधित विद्यार्थ्यांचे निधी मागणीचे प्रस्ताव तपासून निधी मंजूर करण्याबाबतची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. सदर निधी खर्च करतांना वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तींचा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

५. सदर खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक झेडजी-०३ (०२) (१८) विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परेदशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (२२२५ एफ २१८)" या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध केलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०८०७१४२३४०४४३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIVEDITA LOKESH WARULE

Digitally signed by NIVEDITA LOKESH WARULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=3ef8c2c4c081462a26dea72c10274caaa77d92363242a1bff9454421d88652f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8A41558A05225BDD429CBDFA69D2436A1EA3BC5173099C377F9F8B13C78A9D57, cn=NIVEDITA LOKESH WARULE
Date: 2024.08.07 14:38:32 +05'30'

**( नि.लो.वारुळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, अमरावती.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
६. प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, अमरावती.
७. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
८. मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवडनस्ती (शिक्षण-२)